सहाय्यक वनसंरक्षक,गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्र.एमएफएस-२०१८/प्र.क्र.१२७/फ-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० जानेवारी, २०१९

**पहा :-** १) सामान्य प्रशासन विभागाची अधिसुचना क्र क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/ का-१२,दि.१५/१२/२०१७.
२) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या दि.२६/०९/२०१८ रोजीचे आदेश
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. मवसे/निसू/०७/१५-१६/भाग-३/प्र.क्र.९/कक्ष-९ दि.२०/११/२०१८.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) नागपूर यांचे पत्र क्र. मवसे/निसू/०७/१५-१६/ भाग-३/प्र.क्र.९/ कक्ष-९ /२८९८/१८-१९ दि.३/०१/२०१९.

**शासन आदेश :-**

श्री.शामराव कृष्णा पाटील, वनक्षेत्रपाल यांचेविरुद्ध सुरू असलेल्या विभागीय चौकशी प्रकरण निकाली निघाले असल्याकारणाने श्री.पाटील यांच्या पदोन्नतीच्या प्रकरणाचे पुनर्विलोकन करुन त्यांना सहायक वनसंरक्षक संवर्गात पदोन्नती देण्याबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि.२६/०९/२०१८ रोजी आदेश दिले आहेत.

२. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे उपरोक्त आदेश तसेच शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/का-१२,दि.१५/१२/२०१७ मधील तरतुदीनुसार वनक्षेत्रपाल, गट-ब या संवर्गातून सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी दि.०६/१२/२०१६ रोजी झालेल्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये विभागीय चौकशी / न्यायालयीन प्रकरण प्रलंबित असणे याकारणास्तव पदोन्नतीसाठी अपात्र ठरविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचे दि.१७/११/२०१८ रोजीच्या निवड समितीच्या बैठकीमध्ये पुनर्विलोकन करण्यात आले. सदर बैठकीत निवड समितीने पुनर्विलोकनानंतर श्री.शामराव कृष्णा पाटील, वनक्षेत्रपाल, गट- ब यांना सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदावर पदोन्नतीसाठी पात्र ठरविले आहे.

३. श्री.शामराव कृष्णा पाटील यांची वनक्षेत्रपाल, गट- ब या संवर्गातून सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गातील खुल्या प्रवर्गातील राखीव जागांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | मंजूर महसूली संवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना | तदर्थ पदोन्नतीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.शामराव कृष्णा पाटील | पुणे | खुला | सहाय्यक वन संरक्षक (कार्यआयोजना) कोल्हापुर वन संरक्षक, कार्य आयोजना विभाग,कोल्हापूर (रिक्त पदावर) | दि.११/०५/२०१७ |

**४.** श्री.शामराव कृष्णा पाटील यांच्या पदोन्नतीने रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**५.** श्री.शामराव कृष्णा पाटील यांची सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदावरील तदर्थ पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन असून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. तसेच खालील अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे :-

अ) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील तदर्थ पदोन्नती राहील.

आ) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच जेष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

**६.** सदर पदोन्नत अधिकाऱ्यास कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाही तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) **या** पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

**७.** पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

८. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

९. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९०११०११००१११९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2019.01.10 11:09:16 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्यआयोजना), नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) कोल्हापूर
६. वनसंरक्षक (कार्यआयोजना),पुणे.
७. विभागीय वन अधिकारी (प्रादे.) सांगली
८. विभागीय वन अधिकारी (कार्यआयोजना) कोल्हापूर
९. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१०.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी कोल्हापूर/ सांगली
१२.मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१३.मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१४.सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१५.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) , म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१६.निवड नस्ती (फ-८ कार्यासन)महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२